**भारतीय वन सेवेतील सन २०२० च्या तुकडीतील अधिका-यांकरीता "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण आयोजित करण्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- आयएफएस-५०२२/प्र.क्र.४२/फ-७ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- २ मे, २०२२

**संदर्भ**:- १. पर्यावरण, वने व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांचे अ. शा. पत्र क्र.15011/10/2010-IFS-II, दिनांक १८/०३/२०१६

२. इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी,डेहराडून यांचे पत्र क्र. 2161/NFA-2022/70.21/ (2020-22 Course), दिनांक १४/०३/२०२२.

३. इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून यांचे पत्र क्र. 11/NFA-2022/70.21 / (2020-22 Course), दिनांक ०४/०४/२०२२.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),म.रा.नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-९/ भावसे/ मेंटर-६/ प्र.क्र.०९ (२१-२२)/२५/२२-२३, दिनांक २०/०४/२०२२.

**प्रस्तावना:-**

संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून यांच्या संदर्भाधीन दि.१४/०३/२०२२ व दिनांक ०४/०४/२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविल्यानुसार, सन २०२० च्या तुकडीतील ,भारतीय वन सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील सन २०२०-२०२२ च्या अभ्यासक्रमातील, ०२ (दोन) परिविक्षाधिन अधिकारी, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून येथे प्रशिक्षण घेत आहेत. त्यांना ॲकॅडमी मधून दि. ०६/०५/२०२२ रोजी राज्यात रुजू होण्याकरीता कार्यमुक्त करण्यात येणार असून सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना संबंधित राज्यांमध्ये १६ आठवड्यांचे "On the Job Training (OJT)" आयोजित करण्याची विनंती करण्यात आली आहे.

यास्तव भारतीय वन सेवेतील सन २०२० च्या तुकडीतील परिविक्षाधिन अधिकारी यांचेकरीता "On the Job Training (OJT)" करिता कनिष्ठ समय वेतनश्रेणीत (वेतन श्रेणी Level १० in the Pay Matrix) सहाय्यक वनसंरक्षकाची ०२ (दोन) अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२० च्या तुकडीतील, भारतीय वन सेवेतील, महाराष्ट्र संवर्गातील ०२ (दोन) परिविक्षाधीन अधिकारी यांना इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडूनमधून दिनांक ०६/०५/२०२२ रोजी कार्यमुक्त करण्यात येणार आहे. संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून यांनी संदर्भाधीन दिनांक ०४/०४/२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविल्यानुसार उक्त भावसे परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना राज्यात रुजू झाल्यावर १६ आठवड्यांचे (दि. ७ मे २०२२ ते दि. २८ ऑगस्ट, २०२२) "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण राज्यातील वनवृत्तांमध्ये द्यावयाचे आहे.

२. उक्त परिविक्षाधिन भावसे अधिकाऱ्यांना प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर यांनी संदर्भाधिन दि. २०/०४/२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविल्यानुसार खालीलप्रमाणे १६ आठवड्यांचे "On the Job Training (OJT)" आयोजित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| Sr. No. | No. & Week | Attachment |
|---|---|---|
| 1 | 1 Week | Forest HQ Attachment<br>Chandrapur Academy- 3 Days<br>PCCF Office - 2 Days |
| 2 | 1 Week | Division Attachment |
| 3 | 1 Week | Circle Attachment |
| 4 | 1 Week | District Attachment |
| 5 | 12 Week | Range Attachment |
| Total | 16 Week | |

३. त्यानुसार,भारतीय वन सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील सन २०२० च्या तुकडीतील परिविक्षाधिन अधिका-यांसाठी राज्यातील १६ आठवड्यांचे "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण आयोजित करण्यासाठी त्यांच्याकरीता वन विभागात कनिष्ठ समय वेतनश्रेणीत (वेतन श्रेणी Level १० in the Pay Matrix) सहाय्यक वनसंरक्षकाची, महाराष्ट्र राज्यातील वनवृत्तातील खालीलप्रमाणे ०२ (दोन) अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | वनवृत्ताचे नाव | वन विभाग |
|---|---|---|---|
| १. | श्री. हरविर सिंह | गडचिरोली | गडचिरोली |
| २. | श्री. वरुण बी. आर. | गडचिरोली | आल्लापल्ली |

सदर अधिसंख्य पदे दिनांक ७ मे, २०२२ ते दिनांक २८ ऑगस्ट, २०२२ या कालावधीसाठी अस्तित्वात राहतील.

४. त्याचप्रमाणे उक्त परिविक्षाधिन अधिकाऱ्यांच्या "On the Job Training (OJT)" प्रशिक्षणाकरिता समन्वय राखण्यासाठी मार्गदर्शक (Mentor) म्हणून श्री. आर. के. वानखेडे, मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे यांची नेमणूक करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५.  उक्त अधिका-यांकरीता दिनांक ७ मे, २०२२ ते दिनांक २८ ऑगस्ट, २०२२ या कालावधीकरीताचा सदर पदावरील वेतन व भत्यापोटी येणारा खर्च प्रधानशिर्ष " मुख्य लेखाशिर्ष २४०६-वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), १०१ वनसंधारण व विकास, १०१ (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) ०१-वेतन " या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

६.  सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि२०१२/प्र.क्र.६६/१२/ वित्तिय सुधारणा-१, दि. ११ जुलै २०१२ व शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/ वित्तिय सुधारणा-१ , दि. २० फेब्रुवारी, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५०२१५०३४०६०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

NITIN SADASHIV SAWANT

Digitally signed by NITIN SADASHIV SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce65376118f16eabc6bb83139cec7a6499c585244177b9e86b9f2b6977fc54bc, pseudonym=48205F66F6F36F3FDFCA81E8F18AD753D4E8D210, serialNumber=92087EBB35BBE95B659936C9554A22E36F25A3F5BDFD15C4C5B8456BE75E7E5B, cn=NITIN SADASHIV SAWANT
Date: 2022.05.02 15:04:32 +05'30'

( नितीन सावंत )

**कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रत:-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (वने) यांचे स्विय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. संचालक,इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अॅकडमी, डेहराडून,
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (कार्मिक),नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) चंद्रपूर.
८. मुख्य वनसंरक्षक, ( शिक्षण व प्रशिक्षण) पुणे.
९. मुख्य वनसंरक्षक गडचिरोली.
१०.संबंधित परिविक्षाधिन भावसे अधिकारी.
११.महालेखापाल (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता )मुंबई/नागपूर.
१२.अवर सचिव, कार्यासन /फ-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.कोषागार अधिकारी, गडचिरोली.
१४.सहायक संचालक, भावसे/लेखा कक्ष, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती, कार्यासन फ-७ अ.